**सन २०१४-१५ करीता अर्थसंकल्पातील तरतूदींचे वाटप-विशेष नियोजन प्राधिकरण चंद्रपूर-नवीन चंद्रपूर शहराच्या विकासाची कामे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नविचं-२०११/प्र.क्र.११/गृनिधो-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५.

**वाचा :** १) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.नाम/मुअ-१/काअ-२/चंद्रपूर/१३३८४/२०१४,दि.९ डिसेंबर, २०१४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासनाने चंद्रपूर जिल्हयातील १३९१.७१ हेक्टर इतक्या क्षेत्रावर नवीन चंद्रपूर शहर वसविण्याचा निर्णय घेतला असून, नवीन चंद्रपूर येथील अधिसूचित विभागात विकासाची कामे करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्ती केली आहे. सदर योजनेची कामे प्राधिकरणाच्या नागपूर मंडळामार्फत कार्यान्वित करण्यात येत आहेत. या योजनेच्या विकास आराखडयास शासनाने दिनांक ३०.६.१९९८ च्या अधिसूचनेन्वये मंजूरी दिलेली आहे.

प्राधिकरणाकडून राबविण्यात येत असलेल्या सदर योजनेअंतर्गत नवीन चंद्रपूर येथे बाहय विद्यूत पुरवठा, पाणी पुरवठा व मुख्य रस्त्याची कामे तसेच विकास आराखडयातील उर्वरित मुख्य रस्त्यांच्या जमीनीच्या भूसंपादनाची कार्यवाही इत्यादि कामांचा अंतर्भाव आहे. सदर योजना ही एक दीर्घ पल्ल्याची योजना असून ती निधीच्या उपलब्धतेनुसार राबविण्यात येत आहे.

नवीन चंद्रपूर विकास योजनेच्या कामासाठी आवश्यक असलेला निधी प्रथम प्राधिकरणाने खर्च करावा, व त्या खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून केली जाईल, असा निर्णय शासन स्तरावर घेण्यात आला आहे. प्राधिकरणाने या योजनेसाठी आतापर्यंत केलेला खर्च रु.१४५.९३ कोटी इतका आहे. त्यापैकी सन २०१२-१३ पर्यंत रु.६६.०९ कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सन २०१३-१४ मध्ये या योजनेकरीता रु.५२.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. आता सन २०१४-१५ मध्ये या योजनेकरीता रु.४०.४१ कोटी इतका निधी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिला आहे. सदर रक्कम वर नमूद केल्या प्रमाणे झालेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्यासाठी प्राधिकरणास सुपूर्द करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. त्या अनुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :**

नविन चंद्रपूर शहराच्या विकास कामाकरीता सन २०१४- २०१५ या आर्थिक वर्षामध्ये करण्यात आलेल्या रू.७५.०० कोटी इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी वित्त विभागाने वितरणासाठी मंजूर केलेली रु.४०.४१ कोटी (रूपये चाळीस कोटी एक्केचाळीस लक्ष फक्त) इतकी तरतूद, खालील अटी व शर्तीच्या

अधिन राहून या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास सुपूर्द करण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती</u>**

१.अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच कारणासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे. जर रक्कम ज्या कारणासाठी वितरीत केली आहे, त्या कारणासाठी वापरली नाही तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

२.महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने सदर निधीतून होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३.महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने अवर सचिव, गृहनिर्माण विभाग (आहरण व संवितरण अधिकारी) यांच्या प्रतिस्वाक्षरीसह सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयात विहित प्रपत्रात या आदेशाच्या प्रतींसह सादर करावे.

४.या अनुदानाविषयीचे लेखे केंद्र शासन / महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरीता / पाहणीकरीता सादर करण्यात यावेत.

याप्रित्यर्थ होणारा खर्च, "मागणी क्र. क्यु-३- २२१६, गृहनिर्माण (०३) (०६) नविन चंद्रपूर शहराचा विकास -३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१६ ११०२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१४- २०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर तरतूदींमधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४७ / व्यय-३, दिनांक ३१ मार्च, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०७१७१४४४०९०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant P Badgeri

Digitally signed by Prashant P Badgeri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prashant P Badgeri
Date: 2015.04.07 17:25:19 +05'30'

**( प्र.पु.बडगेरी )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) /लेखापरीक्षा.
२. महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) /लेखापरीक्षा,
३. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू.), मुंबई-५१.
६. मुख्य अधिकारी, नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ,सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.
७. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई-५१.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू.), मुंबई- ५१.
१०.अवर सचिव, रोखशाखा / अर्थसंकल्प-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
११.कक्ष अधिकारी, व्यय-३/ अर्थोपाय / अर्थसंकल्प-१७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.कक्ष अधिकारी (१४७२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.निवड नस्ती (गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.